**पर्यटन धोरणांतर्गत प्राप्त पर्यटन प्रकल्पांना अनुज्ञेय वित्तीय प्रोसाहन सवलतीपोटी वस्तु व सेवा करातील राज्याच्या हिश्यांच्या रक्कमेइतकी रक्कम सन २०२३-२४ या वित्तीय वर्षामध्ये परतावा म्हणून वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः TD-१५०११/१/२०२४-T३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई -४०००३२
दिनांक : ३० मार्च, २०२४.

**संदर्भ :-**
१. विभागाचा शासन निर्णय क्र. टिडीसी२०१७/९/प्र.क्र१०४/पर्यटन,दि.०४.०३.२०२०
२. विभागाचा शासन निर्णय क्र. टिडीएस २०२२/०२/प्र.क्र.९६/पर्यटन,दि.०८.०३.२०२२
३. पर्यटन संचालनालयाचे पत्र क्र.प.सं./पर्यटन धोरण/ SGST Refund /२०२४, दि.२८.०३.२०२४

<u>प्रस्तावना</u> :-

वस्तू व सेवा कर अधिनियमानुसार करांमध्ये सूट देण्याचे प्रावधान नसल्याने पर्यटन धोरण -१९९९, पर्यटन धोरण-२००६ व पर्यटन धोरण-२०१६ अंतर्गत पात्र पर्यटन प्रकल्पांना अनुज्ञेय करण्यात आलेल्या विक्रीकर, ऐषाराम कर, करमणूक कर, मुल्यवर्धित कर इत्यादी करांमधून सूट देण्याच्या सवलतीपोटी स्वतंत्ररित्या अनुज्ञेय करण्याचा परतावा हा सवलत रकमेच्या कमाल मर्यादेपर्यंत किंवा प्रोत्साहन सवलतींच्या मूळ अनुज्ञेय कालावधीपर्यंत यापैकी ज्याची पुर्तता आधी होईल तोपर्यत अनुज्ञेय करण्याबाबत संदर्भ क्र.१ येथील दि.०४.०३.२०२० रोजीच्या शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे.

पर्यटन संचालनालयाने संदर्भ क्रमांक ३ येथील पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावात नमूद अ.क्र. १,२, व ३ या एकूण ०३ पात्र पर्यटन घटकांनी सन २०२०-२१ ते २०२१-२२ या वित्तीय वर्षात वस्तू व सेवाकर परताव्यापोटी भरणा केलेल्या एकुण रक्कमेपैकी ८५ टक्के परतावा या पूर्वी संदर्भाधिन क्र.२ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला असून उर्वरित १५ टक्के परतावा वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

<u>शासन निर्णय :-</u>

आता, राज्य वस्तू व सेवा कर विभागाने प्रमाणित केल्यानुसार संचालनालयाच्या संदर्भाधिन क्र.३ च्या पत्रातील नमूद अ.क्र. १,२, व ३ या एकूण ०३ पात्र पर्यटन घटकांना सोबत जोडलेल्या परिशिष्ट-अ मध्ये स्तंभ क्र.८ येथे नमूद केलेली राज्य वस्तू व सेवा कराची उर्वरित १५ टक्के एकूण रु. **१,४१,६०६**/- (रुपये एक लक्ष एक्केचाळीस हजार सहाशे सहा रुपये) एवढी रक्कम परतावा म्हणून वितरीत करण्यास याद्वारे शासन मान्यता देत आहे.

०२. संदर्भाधिन क्र. १ च्या दि.०४.०३.२०२० रोजीच्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र. ३.२ मधील तरतुदीनुसार संचालक, पर्यटन संचालनालय यांनी पात्र पर्यटन घटकांनी सादर केलेल्या दाव्यांची पुन्हा एकदा शहानिशा करुन तसेच पात्र पर्यटन घटकांनी केलेली मागणी पर्यटन धोरणानुसार अनुज्ञेय असल्याची खात्री करुन निधी वितरीत करण्याबाबतची संचालनालयाने दक्षता घ्यावी. तसेच, कोणत्याही परिस्थितीत मंजूर अनुदानापेक्षा जास्त निधी खर्च होणार नाही, याचीही दक्षता घेण्यात यावी. मंजूर अनुदानापेक्षा जादा निधी खर्च

झाल्यास त्याची जबाबदारी संचालक, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांची राहील व जादा खर्चाप्रित्यर्थ जादा रक्कम उपलब्ध करुन दिली जाणार नाही.

०३. वर नमूद करण्यात आलेला खर्च हा सन २०२३-२४ या वित्तीय वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून मागणी क्रमांक झेडडी - ४. मुख्य लेखाशीर्ष ३४५२, पर्यटन "पर्यटन धोरणांतर्गत पात्र पर्यटन प्रकल्पांना वित्तीय प्रोत्साहनाच्या सवलीतीपोटी वस्तू व सेवा करातील राज्याच्या हिश्याच्या रक्कमेचा परतावा (३४५२ २९९२) (अनिवार्य) ५०, इतर खर्च" या लेखाशिर्षाखालील मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा. या प्रकरणो मंजूर करण्यात आलेली रक्कम आहरित करुन संबंधितांना वितरीत करण्याकरीता मुख्य लेखाधिकारी, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना "आहरण व संवितरण अधिकारी" आणि सहसंचालक पर्यटन संचालयाने मुंबई यांना "नियंत्रक अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. मंजूर करण्यात आलेली रक्कम अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, मुंबई येथून आहरित करुन संबंधितांना विहित पध्दतीव्दारे वितरीत करण्यात यावी, केलेल्या कार्यवाहीबाबतचा अनुपालन अहवाल शासनास एक महिन्यात सादर करण्यात यावा.

०४. संबंधित पात्र पर्यटन घटकांना रक्कमा अदा करण्यापूर्वी तसेच वितरीत केलेल्या निधीतून खर्च करताना वित्तीय नियमांचे आणि विविध नियमांतर्गत नेमून दिलेल्या कार्यपध्दतीचे तसेच संदर्भ क्रमांक ०१ येथील दिनांक ०४/०३/२०२० च्या शासन निर्णयामधील परिच्छेद ३ (३.१ ते ३.८) मधील तरतुदींचे पालन करण्यात आले आहे, याची खातरजमा करण्यात यावी.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३३०१७०९४७०३२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

SANTOSH VITHAL ROKADE

Digitally signed by SANTOSH VITHAL ROKADE
DN: CN = SANTOSH VITHAL ROKADE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT
Date: 2024.03.30 17:19:43 +05'30'

**(संतोष वि. रोकडे)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**सोबत :-परिशिष्ट-अ**

**प्रत,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र -१ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई,
२. महालेखापाल, महाराष्ट्र -२ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), नागपूर,
३. महालेखापाल (स्थानिक निकाय लेखापरीक्षा व लेखा), मुंबई,
४. मा. मंत्री (पर्यटन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२,
५. सचिव (पर्यटन) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
६. संचालक, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
९. अवर सचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग (अर्थसंकल्प शाखा), मंत्रालय, मुंबई,
१०. निवड नस्ती (पर्यटन-४).

## परिशिष्ट-अ

(रक्कम रु.)

| अ.क्र. | प्रकल्पाचे नाव | GST नोंदणी प्रमाणपत्र | मागणी (रु.) | | एकूण मागणी (रु.) | देण्यात आलेला परतावा (एकूण मागणीच्या ८५ % च्या मर्यादेत (रु.)) | उर्वरित देय १५% च्या मर्यादेत परतावा |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | सन २०२०-२१ | सन २०२१-२२ | | | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १. | हॉटेल नागपूर अशोक (संजय गुप्ता) | 27ABMPG7867QIZL | ३,५९,००० | - | ३,५९,००० | ३,०५,१५० | ५३,८५० |
| २. | हॉटेल नागपूर अशोक (संजय गुप्ता) विस्तारीत घटक | 27ABMPG7867QIZL | ९०,००० | - | ९०,००० | ७६,५०० | १३,५०० |
| ३. | रॉयल बल्यु रिसोर्ट प्रा.लि | 27AAFCR4121H1ZK | ४,९५,०३५ | - | ४,९५,०३५ | ४,२०,७८० | ७४,२५५ |
| | **एकुण** | | **९,४४,०३५** | - | **९,४४,०३५** | **८,०२,४२९** | **१,४१,६०६** |